महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा)
मधील अधिकाऱ्यांच्या नियतकालीक बदल्या-
प्राचार्य, गट-अ

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३१२३/प्र.क्र.१०२/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ जून, २०२३.

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय.क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.४१५/कार्यासन-१२, दिनांक ९.४.२०१८

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अंमलात आले आहे. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, या कलमाखाली त्याचे अधिकार त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याचा निर्णय दिनांक ३० मे, २०१५ च्या शासन निर्णयाद्वारे घेण्यात आलेला आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ३(१) मधील तरतुदीनुसार दिनांक ३१.५.२०२३ रोजी पदस्थापनेच्या पदावर तीन वर्षाचा कालावधी पूर्ण करणाऱ्या बदलीपात्र अधिकाऱ्यांच्या बदलीचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळ क्र.१ समोर सादर करण्यात आला होता. नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेलया पूर्व मान्यतेनुसार पुढील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र.<br>१ | नाव व पदनाम<br>२ | बदलीनंतरची पदस्थापना<br>३ |
|---|---|---|
| १ | डॉ. रमेश आप्पाणा होसकोटी<br>प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था,<br>जि.सांगली | प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था,<br>जि. सिंधुदूर्ग. |

| अ.क्र. १ | नाव व पदनाम २ | बदलीनंतरची पदस्थापना ३ |
|---|---|---|
| २ | श्री. भानुदास भगवंता पुटवाड, प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, जि.हिगोंली | प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, जि. वाशिम |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/ अकरा, दिनांक ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्राकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२३१९५२३४४०२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c7a4e31cd0e0c9eec89f89869f2dd675d71f0636b0a2ea82e485826669926889, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7966FB8DA6E03C3F79409670C65FAC077378A68F734A11D051D02DC3119DC128, cn=VIJAY NIVRUTTI BHOSALE
Date: 2023.06.23 19:53:36 +05'30'

**( विजय भोसले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा . विधानसभा , विधानपरिषद व संसद सदस्य
८. मा . मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा . उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा . मंत्री ( शालेय शिक्षण विभाग ) यांचे स्वीय सहायक

११. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ) यांचे स्वीय सहायक

१२. आयुक्त (शिक्षण) , महाराष्ट्र राज्य , पुणे

१३. राज्य प्रकल्प संचालक , महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद , चर्नीरोड , मुंबई

१४. सहसचिव /उपसचिव (विद्यार्थी विकास/शाळा व्यवस्थापन/शिक्षक शिक्षकेत्तर/क्रीडा/प्रशासन) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई

१५. सर्व शिक्षण संचालक

१६. अध्यक्ष , माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ , महाराष्ट्र राज्य , पुणे

१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक

१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद

१९. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक /योजना)

२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२१. सर्व अधिक्षक , वेतन पथक ( प्राथमिक / माध्यमिक )

२२. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

२३. सर्व कार्यासने , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय , मुंबई

२४. निवड नस्ती , प्रशा -२ , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय , मुंबई.